**जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, सातारा या कार्यालयाकडील जुने वाहन निर्लेखित करुन नवीन वाहन खरेदीस परवानगी देणेबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः जिग्राप्र-१११६/प्र.क्र.६२/योजना-५

बांधकाम भवन इमारत,तळमजला
२५,मर्झबान पथ, फोर्ट,मुंबई-४०० ००१.
दिनांक : २८ ऑक्टोंबर,२०१६.

**वाचा :-**

१) केंद्र शासनाचे पत्र क्र.R-२००१५/३२/२००४ DRDA, दिनांक ३ जानेवारी,२००५.
२) शासन निर्णय क्र.वाहन-२००४/प्र.क्र.६१३/योजना-५, दिनांक ६ मे, २००५.
३) केंद्र शासनाचे पत्र क्रमांक R-२००१५/२४/२००७-DRDA, दिनांक ३० जुलै,२००८.
४) शासन निर्णय वित्त विभाग क्रवाहन.-२०१०/प्र.क्र.५०/१०/विनियम, दिनांक १० जानेवारी,२०११.
५) ग्रामविकास व जलसंधारण विभागाचा शासन निर्णय क्र.जिग्राप्र२०१०/प्र.क्र-११०-अ/ योजना-५/ दिनांक १८ नोव्हेंबर,२०१३.
६) वित्त विभाग, शासन निर्णय क्र वाहन.२०१४/प्र.क्र.९/१४-विनियम, दि.४-८-२०१४.
७) प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, सातारा यांचे पत्र क्र.जि.ग्रा.वि.यं./ आस्था-२/५५१/२०१६/दिनांक ३१ मे,२०१६.

**प्रस्तावना :-**

जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांमार्फत विविध केंद्र पुरस्कृत योजना राबविण्यात येत असून त्यासाठी येणारा खर्च भागविण्यासाठी दिनांक १ एप्रिल, १९९९ पासून जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन योजना अंमलात आली आहे. या यंत्रणेमधील कर्मचाऱ्यांचे वेतन व कार्यालयीन खर्चासाठी केंद्र शासनाकडून ६० % व राज्य शासनाकडून ४० % अनुदान प्राप्त होते. केंद्र पुरस्कृत योजनांची अंमलबजावणी परिणामकारक रित्या झाली नाही तर त्या योजनांसाठी केंद्र शासनाकडून प्राप्त होणाऱ्या निधीत कपात करण्यात येते. याकरीता जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेमधील अधिकाऱ्यांना वारंवार गट पातळीवर दौरे करावे लागतात. त्यासाठी नवीन वाहनांची नितांत आवश्यकता असते.

केंद्र शासनाकडून व राज्य शासनाकडून उपलब्ध होणारे अनुदान त्याचप्रमाणे राज्यातील जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना आवश्यक ते वाहन खरेदीसाठी राज्य शासनाला प्रदान करण्यात आलेले अधिकार लक्षात घेऊन जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेतील जुने वाहन निर्लेखित करुन त्याऐवजी नवीन वाहन शासन दर करारावर खरेदी करण्यास मंजुरी देण्याबाबतचा प्रस्ताव सातारा जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेकडून प्राप्त झालेला आहे. वित्त विभागाचा शासन निर्णय दिनांक १० जानेवारी,२०११ नुसार जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेकडील

वाहनांचा आढावा उच्चस्तर समितीद्वारे घेण्यात आलेला आहे. यात जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, सातारा कार्यालयास दोन वाहने (१ कार व १ जीप) अनुज्ञेय आहे. वाहनांचा आढावा घेण्यात आलेला आहे व वाहन चालकाचे पद उपलब्ध आहे. अशा जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना जुने वाहन निर्लेखित करुन त्याऐवजी नवीन वाहन शासन दर करारावर खरेदी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

केंद्र शासनाच्या क्रमांक-आर-२००१५/३२/२००४/DRDA, दिनांक ३ जानेवारी, २००५ च्या पत्रास अनुलक्षून सदर पत्रात विहित करण्यात आलेल्या अटींची पूर्तता करणाऱ्या जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, सातारा यांना त्यांच्या कडील क्र.MH-११-Y-५८१७ (जीप) हे वाहन निर्लेखित करुन तसेच त्या वाहनांच्या बदल्यात त्याच प्रकारचे एक नवीन वाहन (जीप) खरेदी करण्यास खालील अटींच्या अधिन राहून या शासन निर्णयाद्वारे मंजुरी देण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| १ | जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, साताराकडील वाहन खरेदी करताना जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन या योजनेतर्गंत ३०% प्रशासकीय खर्चापेक्षा जास्त खर्च होणार नाही याची काळजी घ्यावी. त्यासाठी वेगळयाने निधी उपलब्ध करुन देण्यात येणार नाही. |
| २ | जुने वाहन निर्लेखित करुन नवीन वाहन खरेदीच्या प्रस्तावास प्राधिकृत अभिकरणाची मान्यता असावी. वाहन निर्लेखित करुन येणारी रक्कम शासन खात्यात विहित मुदतीत जमा करावी. |
| ३ | जुने वाहन निर्लेखित करुन नवीन वाहन खरेदीच्या प्रस्तावास जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेच्या नियामक मंडळाची मान्यता असणे आवश्यक आहे. |
| ४ | केंद्र शासनाच्या दिनांक ३ जानेवारी,२००५ च्या पत्रातील अटींची पूर्तता होत असल्याने वाहने निर्लेखित केल्यानंतरच नवीन वाहन खरेदी करण्यात येतील. |
| ५ | वाहन खरेदी शासन निर्णय क्र.वाहन-२०१४/प्र.क्र.९/१४/विनीयम दिनांक ४ ऑगस्ट,२०१४ नुसार अनुज्ञेय केलेल्या रुपये ६ लाखाच्या मर्यादेत (वाहनाची किंमत + विक्रीकर + विमा + टेंम्पररी रजिस्ट्रेशन चार्जेस + मुल्यावर्धीत कर + सहाय्यभूत साहीत्य (Accessories) इ. अंतर्भूत करुन) त्याचप्रकारची नवीन वाहन खरेदी करण्यात यावीत. |
| ६ | वाहनाचा वापर जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेच्या कामासाठीच करण्यात यावा. |

प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, सातारा यांनी जिल्ह्यासाठी नवीन वाहन खरेदी करताना शासनाच्या प्रचलित शासन निर्णयाच्या अटींच्या अधीन राहून करण्यात यावी. तसेच सदर वाहन खरेदी केल्यानंतर कार्यालयीन खर्चासाठी अतिरिक्त निधी मंजूर केली जाणार नाही, याची कृपया नोंद घेण्यात यावी.

सदर प्रयोजनासाठी होणारा खर्च ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार यांचेकडून "जिल्हा ग्रामीण विकास योजना-प्रशासन" या खाली प्राप्त होणाऱ्या ६० % निधीतून व ४० % खर्च राज्य शासनाकडून सन २०१६-१७ साठी मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४६२/१६ विनियम, दिनांक १/१०/२०१६ च्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. 201610281124593920 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arunkumar S Pawar

Digitally signed by Arunkumar S Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Arunkumar S Pawar
Date: 2016.10.28 12:36:25 +05'30'

**(अरुण शं.पवार)**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत, :-

१. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
३. प्रधान सचिव (व्यय/विनियम) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, सातारा.
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, सातारा.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा.
७. प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, सातारा.
८. जिल्हा परिषदांचे अर्थ विभागातील मुख्य लेखा व वित्त अधिकारी, सातारा.
९. कक्ष अधिकारी,योजना-२, वित्त-१, ग्राम विकास व जलंसधारण विभाग,मुंबई.
१०. वित्त विभाग, कार्यासन व्यय-१५ व विनिमय, मंत्रालय, मुंबई
११. निवड नस्ती, कार्यासन योजना-५.